**डोंगरगाव मध्यम प्रकल्प ता. राजुरा, जि. चंद्रपूर प्रकल्पाच्या विशेष दुरुस्तीच्या कामास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत ......**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रमा-२०१५/(८२७ /२०१५)/सिं.व्य.(कामे)**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०६.१२.२०१६

**संदर्भः-**

कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र क्रमांक जावक क्र. ९७४०/विपाविम/कातां ६(२)/(३०९/१५)/पूर्णअ/२०१५, दिनांक ८.१२.२०१५

**प्रस्तावना**

डोंगरगाव मध्यम प्रकल्प, ता.राजुरा, जि. चंद्रपूर हा चिंचाळा या गावाजवळ स्थानिक नाल्यावर सन २००० मध्ये बांधण्यात आला आहे. सदर प्रकल्पाची सिंचन क्षमता ३९४२ हेक्टर असून जून २०१५ अखेर ३१५३ हेक्टर सिंचन क्षमता निर्माण झालेली आहे.

धरण सुरक्षा संघटना, नाशिक यांचे दिनांक ४.१२.२००८ च्या निरीक्षण दरम्यान धरणाचे सुरक्षेकरीता आवश्यक उपाययोजना करण्याचे सूचविण्यात आले आहे सदर कामे ही प्रकल्पाच्या चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्तावात अंतर्भूत होती. सदर सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव शासनास सादर होता. मध्यंतरी दि. ९/०९/२०१५रोजीचा शासन निर्णय अंमलात आल्याने सु.प्र.मा.प्रस्ताव राज्य तांत्रीक सल्लागार समिती, नाशिक यांच्याकडे छाननीसाठी प्रस्तुत करण्यात आला. त्यावर दि.०५/१०/२०१५ रोजी झालेल्या ५९ व्या बैठकीत समितीने ही कामे मूळ स्वरुपाचे नसल्याने वगळून सुधारित प्रशासकीय मान्यतेची किंमत रु.८७.७७ कोटी निश्चित केली आहे. व प्रस्तुत कामे ही विशेष दुरुस्तींतर्गत प्रस्तावित करुन त्यास स्वतंत्र प्रशासकीय मान्यता घेण्या संबंधी समितीने मत व्यक्त केले आहे. त्याअनुषंगाने रु १९८.७४ लक्ष किंमतीचा सन २०१३-१४ च्या दरसूचीनुसार प्रस्ताव प्रशासकीय मान्यतेस्तव प्राप्त आहे. यास्तव संदर्भीय पत्रान्वये प्राप्त विशेष अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय**

**या शासन निर्णयाव्दारे डोंगरगाव मध्यम प्रकल्प , ता.राजुरा , जि. चंद्रपूर येथील विशेष दुरुस्ती कामाच्या रु.१९२.०२ लक्ष (अक्षरी रुपये एकशे ब्याणव लक्ष दोन हजार फक्त) (रु.१७४.५६ लक्ष कामानिमित्त, व रु.१७.४६ लक्ष अनुषंगिक खर्च) खर्चास खालील अटींच्या अधीन राहून सोबतच्या परिशिष्टाप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे..**

१. शासन परिपत्रक क्र. प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिं.व्य.(कामे) , दि. ०१.०१.२०१५, मधील मार्गदर्शक सूचना नुसार अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे बंधनकारक आहे.
२. अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे/ संकल्पने व दरसूची बाहय बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.
३. प्रकल्पा वरील पाणी वापर संस्थेकडे संपूर्ण लाभक्षेत्र हस्तांतरणाचे नियोजन काम सुरु करण्यापूर्वी करावे; कामे पूर्ण झाल्यानंतर लाभक्षेत्र पाणी वापर संस्थेस हस्तांतरण करावे.
४. माती भरावाची व त्याच्या दुरुस्तीची गवत झाडे/झुडुपे काढण्याची कामे जलसंपदा विभागाच्या संघटनेकडे उपलब्ध मशिनरीने करावीत. तथापि, यांत्रिकी संघटनेकडे मशिनरी उपलब्ध नसल्यास तसे प्रमाणपत्र यांत्रिकी संघटनेकडून घेऊन काम करण्याचा निर्णय महामंडळ स्तरावरुन घेण्यात यावा.
५. जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी संघटनेकडून सेवा /आकस्मिक व्दारे निर्मिती/ दुरुस्ती करावी.

६. कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत करावा व कामे नियोजित वेळेत पूर्ण करावीत.

७. सदरच्या कामांचा कार्यारंभ आदेश काढण्यापासून कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा .काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे.

या कामावर होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च (योजनांतर्गत) विस्तार व सुधारणा विशेष दुरुस्ती ११ ( ०१ ) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अनुदान (४७०१ जे १५८) या मुख्य लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय विअप्र २०१३/(प्रक्र ३०/२०१३) विनियम भाग २ दि. १७.४.२०१५ मधील भाग पहिला, उपविभाग - ३ मधील अ.क्र.४ मध्ये विहित केल्यानुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रु ५.०० कोटीपर्यत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबधित विभागास प्रदान केले आहेत. त्या अधिकारानुसार विभागाच्या आंतरवित्तीय सल्लागार यांच्या सहमतीने व नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ६३ का १४३४ दि. ०५/०३/२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार हे आदेश निर्गमित केले.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य.(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र.०७ सन २०१६-१७ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१६१२०७१४५९४५८५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjiv A Tatu

Digitally signed by Sanjiv A Tatu
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SE and Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjiv A Tatu
Date: 2016.12.07 15:02:17 +05'30'

( सं.अ.टाटू )
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
४) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,
५) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई,
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई,
७) मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
८) प्रधानसचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
९) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०) महालेखापाल-१ (लेखावअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
११) महालेखापाल-२ (लेखावअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१२) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर,
१३) मुख्यअभियंता जलसंपदा विभाग, नागपूर,
१४) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
१५) अधीक्षक अभियंता, चंद्रपूर पाटबंधारे प्रकल्प मंडळ, नागपूर,
१६) कार्यकारी अभियंता, मुख्य द्वार उभारणी पथक क्र ५,नाशिक,
१७) सिं.व्य.(कामे) कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक प्रमा २०१५/(८२७ /१५)/ सिं.व्य.(कामे) , दिनांक.०६ .१२.२०१६ चे प्रपत्र

**परिशीष्ट**

| अ.क्र | लेखाशीर्ष | अंदाजीत किंमत( लक्ष रुपये ) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | कामाप्रित्यर्थ | रु. १७४.५६ |
| २ | अनुषंगिक खर्च १० टक्के | रु. १७.४६ |
| | एकूण | रु. १९२.०२ |

Sanjiv A Tatu

Digitally signed by Sanjiv A Tatu
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SE and Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjiv A Tatu
Date: 2016.12.07 15:02:32 +05'30'

( सं.अ.टाटू )
शासनाचे उप सचिव